महाराष्ट्र - कर्नाटक सीमाप्रश्न आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांना निवृत्तीवेतन व इतर आर्थिक लाभ.
वित्तीय वर्ष २०२५-२०२६ मधील एप्रिल व मे, २०२५ या महिन्यांकरिता अनुदानाचे वाटप.

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

**शासन निर्णय, क्रमांक : बियुडी-१८२५/प्र.क्र.२९/२०२५/सीमाप्र**

मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.

**दिनांक : १६ मे, २०२५**

**संदर्भ :-** १. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मकसी/हुंस्माक/१०९६/प्र.क्र.१४/९६/३६, दि.१७.१०.१९९७,
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मकसी-१०९७/प्र.क्र.५४/९७/३६,दि.०८.०१.१९९९,
३. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०७.०४.२०२५,

**प्रस्तावना :-**

"महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०२५" (महाराष्ट्र अधिनियम, २०२५) च्या अनुसूचीतील स्तंभ-४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रकमांस विधानमंडळाने मंजूरी दिलेली असून महाराष्ट्राचे मा.राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिलेली आहे आणि ते महाराष्ट्र अधिनियम क्रमांक-१९ म्हणून, महाराष्ट्र राजपत्र असाधारण भाग-४, दि.३१ मार्च, २०२५ अन्वये प्रसिध्द करण्यात आल्याचे उपरोक्त संदर्भाधीन दि.७/०४/२०२५ च्या शासन परिपत्रकात वित्त विभागाने नमुद केले आहे. तसेच सदर परिपत्रकान्वये सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर, २०२५ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांवरील खर्च याबाबतचा अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतुदीच्या ६०% च्या मर्यादेत वितरीत करण्यास परवानगी दिली आहे.

वित्त विभागाने मंजूर केल्यानुसार सन २०२५-२०२६ अर्थसंकल्पीय अंदाज पुस्तकाच्या आधारे अनिवार्य बाबींसंदर्भात खालील विवरणपत्रात दर्शविलेल्या तरतूदीसंदर्भात वित्त विभागाच्या परिपत्रकास अनुसरुन महाराष्ट्र - कर्नाटक सीमा आंदोलनातील एकूण ९ हुतात्म्यांच्या वारसांना निवृत्तीवेतन व इतर आर्थिक लाभ अदा करण्यासाठी अनुदान वितरीत करण्याची बाब याठिकाणी विचाराधीन आहे. त्यानुषंगाने खालीप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र - कर्नाटक सीमा आंदोलनातील एकूण ९ हुतात्म्यांच्या वारसांना प्रत्येकी रु.२०,०००/- दरमहा इतके निवृतिवेतन, वार्षिक प्रवास भत्ता रु.५००/- व आकस्मिक मदत म्हणून प्रत्येकी रु.५,०००/- वार्षिक याप्रमाणे आर्थिक लाभ शासनाने अनुज्ञेय केले आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भाधीन परिपत्रकानुसार खालील विवरण पत्रामधील स्तंभ क्र.७ मधील अनिवार्य बाबींसंदर्भात मंजूर अनुदान स्तंभ क्र.६ मध्ये निर्देशित केलेल्या आहरण व संवितरण अधिकारी यांनी वित्त विभागाच्या संदर्भाधीन शासन परिपत्रकामधील मार्गदर्शक सूचनांचे पालन करण्याच्या अधिन राहून सन २०२५-२६ मधील अनुदान विहित पध्दतीनुसार खर्च करण्याची दक्षता घ्यावी.

| अ. क्र. | मागणी क्रमांक | योजनेचे नाव | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पीय तरतुद सन २०२५-२६ | आहरण व संवितरण अधिकारी | लेखानुदानाद्वारे एप्रिल व मे, २०२५ करीता वितरीत करण्यात येणारी तरतुद |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | ए-५ | २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, | २२३५२४९३ | रु.२२,१०,०००/- | १) मुंबई शहर (एकूण ३ लाभार्थी) | १,२१,५०० |
| | | | | | २) कोल्हापूर (एकूण ७ लाभार्थी) | २,०२,५०० |
| | | | | | ३) रत्नागिरी (एकूण १ लाभार्थी) | ४०,५०० |
| **एकूण (अक्षरी रुपये तीन लाख चौसष्ठ हजार पाचशे फक्त)** | | | | | | **रु.३,६४,५००/-** |

३. तसेच सदर लेखानुदान पुढील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे :-

१. एप्रिल व मे, २०२५ या दोन महिन्यांचा खर्च संबंधित जिल्हाधिकारी यांनी त्यांना वितरीत केलेल्या तरतुदी इतक्या मर्यादेत ठेवावा.

२. संबंधित जिल्हाधिकारी यांनी उक्त बाबीवर होणाऱ्या खर्चाची वेगळी नोंद ठेवून महालेखापाल कार्यालयामधील खर्चाच्या नोंदीशी ताळमेळ घालून त्याचे विवरणपत्र या कार्यासनासह सामान्य प्रशासन विभाग/ कार्यासन-अर्थसं व वित्त विभाग यांच्याकडे विहित मुदतीत सादर करावी. तसेच कुठल्याही परिस्थितीत “२२३५२४९३” या लेखाशीर्षाखालीच या रकमा त्या त्या महिन्यात खर्ची पडत असल्याची व त्याबाबत खर्चमेळाद्वारे खातरजमा करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील.

३. जिल्हाधिकारी, मुंबई शहर, कोल्हापूर व रत्नागिरी यांनी एप्रिल, २०२५ व मे, २०२५ या दोन ही महिन्यात अधिदान व लेखाधिकारी या कार्यालयाशी संपर्क साधून बीम्स प्रणालीवर नमूद खर्च त्या-त्या महिन्यात खर्ची पडत असल्याची खातरजमा करुन तसे प्रमाणपत्र प्रत्येक महिन्याच्या १० तारखेच्या आत GAD_३६२@maharashtra.gov.in या ई-मेल वर पाठविण्याची जबाबदारी संबंधीत जिल्हाधिकारी कार्यालय यांची राहील.

४. सदर शासन निर्णय, प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०५१६१६०११८९२०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by SHAHAJAHAN SHAKUR MULANI
Date: 2025.05.16 16:02:20 +05'30'

**( श. श. मुलाणी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी रवाना :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) / महालेखापाल (लेखा परीक्षा) , महाराष्ट्र- १, मुंबई.
२. संचालक, लेखा व कोषागारे (संगणक शाखा), मुंबई.
३. प्रधान सचिव (व्यय) / लेखा व कोषागरे, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. जिल्हाधिकारी, मुंबई शहर जिल्हा, जुने जकात गृह, फोर्ट, मुंबई-२३.
५. जिल्हाधिकारी, रत्नागिरी व कोल्हापूर.
६. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा, वांद्रे (पूर्व) मुंबई-५१ यांना असे कळविण्यात येते की, त्यांना आवश्यक असलेले अनुदान जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांच्याकडून मागविण्यात यावे.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी, पुणे व कोल्हापूर.
१०. सामान्य प्रशासन विभाग / कार्यासन-२५, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती (सीमाप्र.).